**नवीन "परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागु असलेल्या कर्मचा-यांच्या सहाव्या वेतन आयोगाची थकबाकी स्तर-२ मध्ये जमा करण्याबाबतची कार्यपध्दती**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय, क्रमांक : अंनियो १०१०/प्र.क्र.६७/सेवा- ४
मंत्रालय, मुंबई - ४०० ३२, दिनांक १४ डिसेंबर,२०१०

**वाचा :** - १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अंनियो १००५/१२६/सेवा -४, दि. ३१ ऑक्टोबर २००५
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अंनियो १००७/१८/सेवा -४, दि. ७ जुलै,२००७
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. वेपूर १२०९/प्र.क्र.६९/सेवा -९, दि. २९ एप्रिल,२००९

**प्रस्तावना**

संदर्भाधिन क्रमांक १ येथील दिनांक ३१ ऑक्टोबर २००५ च्या शासन निर्णयान्वये दिनांक १ नोव्हेंबर २००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांसाठी नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना अंमलात आली आहे. या योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती संदर्भाधिन क्रमांक २ येथील दिनांक ७ जुलै २००७च्या शासन निर्णयान्वये ठरविण्यात आली आहे. ज्या शासकीय कर्मचा-यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागु आहे, अशा कर्मचा-यांना सहाव्या वेतन आयोगाच्या अंमलबजावणीमुळे दि.१ जानेवारी, २००६ ते दि.३१.३.२००९ पर्यंतच्या कालावधीतील सुधारित वेतनाच्या थकबाकीची रक्कम त्यांच्या नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेच्या खात्यात जमा करण्याच्या सूचना संदर्भाधिन क्रमांक ३ येथील दि.२९ एप्रिल, २००९ च्या परिपत्रकातील परि.१५.२ अन्वये देण्यात आल्या आहेत. संदर्भाधिन क्रमांक २ येथील दिनांक ७ जुलै २००७च्या शासन निर्णयातील परि. ६ (ब) स्तर-१ कार्यान्वित करण्यात आला असून त्यात जमा होणारी रक्कम आहरित करता न येण्याजोगी (non-withdrawable) आहे. त्यामुळे या योजनेतील आहरणयोग्य (withdrawable) असलेल्या स्तर-२ मध्ये थकबाकीची रक्कम जमा करण्याबाबतची कार्यपध्दती ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

२. वरिल प्रस्तावनेला अनुलक्षुन शासन निर्णय वित्त विभाग, क्र. अंनियो १००५/१२६/सेवा -४, दि. ३१ ऑक्टोबर २००५ नुसार ज्या कर्मचा-यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागु केली आहे, अशा कर्मचा-यांना सहाव्या वेतन आयोगाच्या अंमलबजावणीमुळे दि.१ जानेवारी, २००६ ते दि.३१.३.२००९ पर्यंतच्या कालावधीतील सुधारित वेतनाच्या थकबाकीची रक्कम जमा करण्याकरिता खालीलप्रमाणे कार्यवाही विहीत करण्यात येत आहे :

१) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत स्तर-२ कार्यान्वित करण्यात येत असून त्यामध्ये पुढील आदेश होईपर्यंत केवळ कर्मचा-यांच्या दि.१ जानेवारी, २००६ ते दि.३१.३.२००९ पर्यंतच्या कालावधीतील सुधारित वेतनाच्या थकबाकीची व त्यावरील व्याजाची रक्कम जमा करण्यात येईल.

२) थकबाकीची रक्कम सन २००९-१० पासून स्तर-२ मध्ये जमा करण्याबाबतची कार्यवाही शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. वेपूर १२०९/प्र.क्र.६९/सेवा -९, दि. २९ एप्रिल,२००९ मधील परि.१५.१ (क) व परि.१५.३ मधील सूचनांप्रमाणे करण्यात यावी. जमा झालेली रक्कम ठरवून दिलेल्या कालावधीनंतर काढण्याकरिताच्या कार्यपध्दतीचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील.

३) दिनांक १ जानेवारी २००६ ते दि.३१ मार्च, २००९ या कालावधीत सेवात्याग केलेल्या/मृत्यु पावलेल्या कर्मचा-यांना थकबाकी अनुज्ञेय असल्यास त्याप्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग,क्र. वेपूर १२०९/प्र.क्र.६९/सेवा-९, दि.२९ एप्रिल,२००९

मधील परि.१५.१ (ड), (ई) व (फ) मधील सूचनांप्रमाणे व शासन निर्णय वित्त विभाग क्र. अंनियो १००९/प्र.क्र. १/सेवा- ४, दि. १२ नोव्हेंबर,२०१० सोबतच्या जोडपत्र १ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) स्तर -२ मध्ये जमा होणा-या रक्कमेचे लेखांकन व इतर कार्यपध्दतीबाबत राज्य अभिलेख देखभाल अभिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे नियंत्रण असेल. राज्य अभिलेख देखभाल अभिकरणाकडून शासकीय कर्मचा-यांना त्यांच्या आहरण व संवितरण अधिका-यांमार्फत प्रत्येक वित्तीय वर्षाच्या अखेरीस वार्षिक विवरणपत्र पाठविण्यात येईल.

५) आहरण व संवितरण अधिका-यांनी वेतन देयकासोबत परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेखाली करण्यात आलेल्या वंजातीची अनुसूची जोडताना स्तर १ व स्तर २ खाली जमा होणा-या रकमा कर्मचा-यांच्या नावासमोर स्वतंत्रपणे दर्शविणे आवश्यक आहे. याकरिता परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना संगणक प्रणालीत स्तर-२ मध्ये जमा होणा-या रकमेची अनुसूची तयार करण्याबाबत उपलब्ध असलेल्या कार्यपध्दतीचा वापर करण्यात यावा.

६) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेमधील स्तर २ मध्ये जमा होणारी रक्कम व त्यावरील व्याजाची रक्कम खालील लेखाशीर्षाखाली जमा करण्यात यावी.:-

"८३४२ इतर ठेवी,
(००) (११७) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना
(०१)(०११) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, शासकीय कर्मचा-यांचे अंशदान, स्तर-२"
(८३४२-५२८-६)

७) प्रतिनियुक्तीवरील कर्मचा-यांच्या स्तर २ मध्ये जमा होणारी रक्कम व त्यावरील व्याजाची रक्कम खालील लेखाशीर्षाखाली जमा करण्यात यावी.:-

"८३४२ इतर ठेवी,
(००) (११७) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना
(०२)(०११) परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना, शासकीय कर्मचा-यांचे अंशदान, स्तर-२"
(८३४२-५२९-५)

३. वरील कार्यपध्दती जिल्हा परिषदा, मान्यता प्राप्त व अनुदानित अशासकीय प्राथमिक व माध्यमिक शाळा, कृषितर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्नित मान्यता प्राप्त व अनुदानित अशासकीय महाविद्यालये तसेच कृषि विद्यापीठे इत्यांदीमधील कर्मचाऱ्यांना योग्य त्या फेरफारांसह लागू राहील. मात्र याबाबत स्वतंत्र सूचना संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी राज्य अभिलेख देखभाल अभिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई तसेच वित्त विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्याबाबतची कार्यवाही करावी.

४. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी हा शासन निर्णय त्यांच्या प्रशासकीय अधिपत्याखालील सर्व कार्यालयांच्या निदर्शनास आणण्याची कार्यवाही प्राथम्याने करावी.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१०१२१५१९००४६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

अ.मु. सोलेगांवकर

**(अ.मु.सोलेगांवकर)**
**शासनाचे सह सचिव**

प्रति,

प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),

सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१२५ प्रती),
महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर (१२५ प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५ प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (२५ प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई (२५ प्रती),
संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई,(१० प्रती) (प्रसिध्दी देण्याच्या विनंतीसहा)
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),
उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १०प्रती),
वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),
सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
*विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
*प्रबंधक,, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा) मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा),मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई/नागपूर/औरंगाबाद
मुख्य माहिती आयुक्त, नवीन प्रशासकीय भवन, १९ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
आयुक्त, राज्य माहिती आयोग (सर्व)
सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, १ला मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
ग्रं थपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई - ४०० ०३२. (१० प्रती)
मंत्रालयातील सर्व विभाग, (२५ प्रती),
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),
तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),
संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),
सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),
शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई, दक्षिण/उत्तर/पश्चिम,
सर्व प्रशासन अधिकारी, नगरपालिका शिक्षण मंडळ (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य (प्रत्येकी ५ प्रती),
सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),
कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),
कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),
कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),
कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),
कुल सचिव, महाराष्ट्र पशु विज्ञान विद्यापीठ, नागपूर (१० प्रती),
कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, जिल्हा रायगड (१० प्रती),
बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान,मुंबई १
भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं. १,योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक,नरिमन पॉईंट]मुंबई २० (५ प्रती),
भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड,, मुंबई ४ (५ प्रती),
भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी , मुंबई १३ (५ प्रती),
इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५ (५ प्रती),
नॅशनलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१ (५ प्रती),
शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८ (५ प्रती),
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

---

***पत्राद्वारे.**